संकेतांक क्र. 201504271046096027

12

पळसुंदे लघु पाटबंधारे तलाव,ता.अकोले,जि.अहमदनगर, योजनेस,सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा १००८/(१३८/२००८) ल.पा.१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १२ ऑक्टोबर, २०११

**पहावे :** कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविम/२०८/(१३७/२००८)/लपा-२/४५६७, दि.१३.०६.२००८ चे पत्र

**प्रस्तावना :**

अहमदनगर जिल्हयातील पळसुंदे लघु पाटबंधारे तलावास शासन निर्णय क्रमांक लपात १००१/१७३/२००१/ लपा१,दि.१०/०५/२००१ अन्वये रु. ४.५८ लक्ष किंमतीस (दरसुची सन १९९९-२०००) प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती.

माहे नोव्हेंबर २००५ मध्ये योजनेच्या कामास प्रत्यक्ष सुरुवात केली. प्रकल्प खर्चात लक्षणीय वाढ झाल्याने सन २००७-०८ ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु १८४०.५४ लक्ष किमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणे बाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महारागष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

अहमदनगर जिल्हयातील पळसुंदे लघु पाटबंधारे तलावास सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु.१८४०.५४ लक्ष (रुपये अठरा कोटी चाळीस लक्ष च्योप्पन्न हजार फक्त, त्यापैकी रु. १६७५.४९ लक्ष कामाप्रीत्यर्थ व रु.१६५.०५ लक्ष अनुषंगिक खर्च) एवढया रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र.), दि.१८.५.९९ मधील तरतूदीनुसार व आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे पत्र क्रमांक व्यअस-२०११/प्र.क्र.३३०/अर्थसंकल्प-२,दिनांक-३०/८/२०११ अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मंजुरीनुसार हा निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे. सदर निर्णयास नियोजन विभागाचा

अनौपचारिक संदर्भ क्रं. १६७/का.१४३४ दि.६/०७/२०११ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रं.३३२/११ अर्थ-२ दि.०८/०८/२०११ अन्वये सहमती प्राप्त झाली आहे. या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. ७०/२०११ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

( मिलिंद हरदास )
**शासनाचे कार्यासन अधिकारी**

प्रत अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
मुख्य अभियंता (जसं.), जलसंपदा विभाग, पुणे
आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे
अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
उपसचिव (लपा)/उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई
ल.पा.१ कार्यासन संग्रहार्थ

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र सुप्रमा १००८/(१३८/२००८) ल.पा.१, दि. १२ ऑक्टोबर, २०११ चे सहपत्र)

## विवरण पत्र

पळसुंदे लघु पाटबंधारे तलाव,ता.अकोले,जि.अहमदनगर,
अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १. | अ - प्राथमिक | ६.४८ |
| २. | ब - भु संपादन | २५.०४ |
| ३. | सी - कामे | १५६५.९६ |
| ४. | डी - विमोचक | ६३.६७ |
| ५. | को.प.बंधारा | - |
| ६. | के - इमारत | - |
| ७. | एम - वृक्षारोपण | - |
| ८. | ओ - संकीर्ण | - |
| ९. | पी - देखभाल | - |
| १०. | इतर शिर्ष | १४.३४ |
| | एकूण | १६७५.४९ |
| ११. | इ.टी.पी (१० %) | १६५.०५ |
| | एकूण | १८४०.५४ |

## ठळक वैशिष्टे

| | | |
|---|---|---|
| १. योजनेची सिंचन क्षमता | - | ५०० हेक्टर |
| २. नियोजित पाणी साठा | - | २४४२ स.घ.मी. |
| ३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत | - | रु ७१३५१/-स.घ.मी.>मापदंड २६४०१/ स.घ.मी. |
| ४. लाभव्यय गुणोत्तर | - | १.०५ > १.०० |